मन्याड प्रकल्पांतर्गत मौजे काकडणे (ता. चाळीसगाव जि. जळगांव) या पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१८/५२/प्र.क्र.१९/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ०३ मार्च, २०२२

**वाचा -**

१) वित्त विभाग शासन निर्णय क्र.बीजीटी-२२७६/७/बीयुडी-१४, दि.२९/१२/१९७६
२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
३) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
४) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
५) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण२०११/प्र.क्र.८०(भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
६) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
७) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए-२०१५/प्र.क्र.२१४/र-१, दि. २३/०९/२०१५
८) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि. १६/१२/२०१५
९) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
१०) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: पुनर्व-२०१८/५२/प्र.क्र.१९/र-८, दि.२३/०२/२०१८
११) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र: कार्या/पुनर्व-९(१)/कावि/२०१९/जा.क्र.२६६७, दि.१५/०२/२०१९
१२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: पुनर्व-२०१८/५२/प्र.क्र.१९/र-८, दि.२०/०३/२०२०
१३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र: कार्या/पुनर्व-९(१)/कावि/२०२१/जा.क्र.५६९९, दि.०५/०४/२०२१
१४) वित्त विभाग शासन निर्णय क्र: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१
१५) वित्त विभाग शासन पत्र क्र: व्ययस-२०२१/प्र.क्र. १०१/अर्थ-२, दि. २०/०८/२०२१
१६) जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र.:निविदा ०४१७/(प्र.क्र.२४७/१७)/मोप्र-१,दि. ३०.११.२०१८

**प्रस्तावना-**

मन्याड प्रकल्पातंर्गत मौजे काकडणे (ता. चाळीसगांव जि. जळगांव) या पुनर्वसित गावठाणांमधील एकूण ६ नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. १० येथील दि. २३/२/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रूपये १,२०,२३,४०७/- रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. निविदा प्रक्रिया राबविण्यापूर्वी दरसूचीमध्ये बदल झाल्याने, विभागीय आयुक्त, नाशिक यांनी संदर्भाधीन क्र. ११ येथील पत्रान्वये सन २०१९-२०२० च्या दरसूचीवर आधारित सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव सादर केला असता संदर्भाधीन क्र. १२ येथील दि. २०.३.२०२० शासन निर्णयान्वये रूपये १,६५,२३,४२९/- रकमेची सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. परंतु कोविड-१९ या संसर्गजन्य रोगामुळे सन २०२०-

२१ या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्तीय उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने शासन निर्णय दि. ४.५.२०२० अन्वये पुढील आदेशापर्यंत कोणतेही बांधकाम हाती घेऊ नये (तांत्रिक मान्यता, प्रशासकीय मान्यता, निविदा, कार्यारंभ आदेश देऊ नयेत) असे आदेश दिले होते. वित्त विभागाने शासन निर्णय दि.१.१२.२०२० अन्वये सदर निर्बंध हटविले आहेत. तथापि, जलसंपदा विभागाच्या संदर्भाधीन क्र. १६ येथे नमूद शासन निर्णयातील तरतूदीनुसार निविदा कार्यवाही हाती घेण्यापूर्वी प्रस्तावित कामाचे अंदाजपत्रक प्रथम चालू दरसूचीने अद्ययावत करणे आवश्यक असल्याने व नवीन दरसूची सन २०२०-२१ लागू झाली असल्याने विभागीय आयुक्त, नाशिक यांनी मौजे काकडणे या पुनर्वसित गावठाणातील सदर कामांच्या अंदाजपत्रकास रुपये १,८७,६४,३२१/- रकमेची "द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता" देण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र. १३ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

२. याबाबत शासन निर्णय क्र.बीजीटी-२२७६/७/बीयुडी-१४, दि. २९.१२.१९७६ नुसार सुरुवातीस मंजूर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५ टक्के पेक्षा अधिक असल्यास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचे अधिकार व्यय अग्रक्रम समितीस आहेत. व्यय अग्रक्रम समितीची बैठक दि.१२.०७.२०२१ रोजी झाली असून त्या बैठकीचे इतिवृत्त वित्त विभागाने संदर्भाधीन क्र. १५ येथील पत्रान्वये निर्गमित केले आहे. त्या अनुषंगाने व्यय अग्रक्रम समितीने दि.१२.०७.२०२१ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार रूपये १,८७,६४,३२१/- इतक्या अंदाजपत्रकीय रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मन्याड प्रकल्पांतर्गत मौजे काकडणे (ता. चाळीसगांव, जि. जळगांव) या पुनर्वसित गावठाणामधील खालील तक्त्यात नमूद ६ नागरी सुविधा कामांच्या एकूण रूपये १,८७,६४,३२१/- (अक्षरी रूपये एक कोटी सत्त्याऐंशी लक्ष चौसष्ट हजार तीनशे एकवीस फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे-

| अ. क्र. | नागरी सुविधा कामांचा तपशील | सन २०१७-१८ च्या दरसूचीवर आधारित शासन निर्णय दि.२३.२.२०१८ अन्वये प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रक्कम (रुपये) | सन २०१९-२० च्या दरसूचीवर आधारित शासन निर्णय दि.२०.३.२०२० अन्वये प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता रक्कम (रुपये) | सन २०२०-२१ च्या दरसूचीवर आधारित द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | खडीचे अंतर्गत रस्ते व एक डांबरी पोहोचरस्ता | ३१,३९,४६०/- | ४०,९०,५०५/- | ४६,४८,२६९/- |
| २ | चावडी बांधणे | ५,९५,६८८/- | ७,९२,१९६/- | ८,९२,९१८/- |
| ३ | उघडी गटारे बांधणे | ६९,०३,७०२/- | ९८,७५,४५०/- | १,१२,७२,६३३/- |
| ४ | गुरांसाठी पाण्याचा हौद | ७,०३,०१८/- | ९,०१,५०४/- | १०,०१,५७०/- |
| ५ | स्मशानभुमी | ४,४०,८९०/- | ५,५०,४३१/- | ५,९७,३७९/- |
| ६ | बसथांबा | २,४०,६४९/- | ३,१३,३४३/- | ३,५१,५५२/- |
| | **एकूण-** | **१,२०,२३,४०७/-** | **१,६५,२३,४२९/-** | **१,८७,६४,३२१/-** |

२. मौजे काकडणे (ता. चाळीसगांव, जि. जळगांव) या पुनर्वसित गावठाणामधील उपरोक्त तक्त्यात नमूद ६ नागरी सुविधा कामांची अंमलबजावणी करताना प्रशासकीय/सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतच्या शासन निर्णय दि. २३.२.२०१८ व दि. २०.३.२०२० मधील अटी व शर्तीचे पालन करावे. प्रस्तुत प्रकरणी सदर ६ नागरी सुविधा कामांना खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

अ) योजनेची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे याची सर्वस्वी जबाबदारी प्रकल्प यंत्रणेची राहील.

ब) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदा विषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी प्रकल्प यंत्रणेची राहिल.

३. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन, तसेच व्यय अग्रक्रम समितीने दि.१२.०७.२०२१ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग, जळगांव यांनी निविदा प्रक्रिया तात्काळी पूर्ण करुन, निविदेनुसार कामे तात्काळ सुरु करावे व नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल(Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल (Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाच्या कालावधीत कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार "मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (कार्यक्रमांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०३१३०३२७८८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, pseudonym=CB263AE7A97BA5DB04805052B34A6E185702D5F9, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2022.03.03 13:05:16 +05'30'

**(संजय जगताप)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) नाशिकविभाग,नाशिक
२. उप आयुक्त (पुनर्वसन), नाशिक
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक जळगांव
४. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव
५. कार्यकारीअभियंता,गिरणा पाटबंधारे विभाग, जळगांव
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)

८. जिल्हा कोषागार अधिकारी,जळगांव

९. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन ) जळगांव

१०.वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-२/६, मंत्रालय,मुंबई-३२.

११.नियोजन विभाग,कार्यासन १४७५,मंत्रालय,मुंबई ३२.

१२.महसूल व वन विभाग,कक्ष अधिकारी ब-१, पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय,मुंबई ३२.

१३.निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

*****